केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांकरिता निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सपववि ४००१२/५/२०२५ DESK SERICULTURE -CMTD**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ३१ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सपववि ४००१५/२/२०२३, DESKSERICULTURE CMTD, दिनांक ९ फेब्रुवारी, २०२४
२) केंद्रीय रेशीम मंडळाचे पत्र क्र.CSB-37/1/ CSs(SS-2) Maharashtra/2021-26/ Vol.1, दिनांक २७ मार्च, २०२३.
३) केंद्रीय रेशीम मंडळाचे पत्र क्र.CSB-37/1/ CSs(SS-2) Maharashtra/2021-26/ Vol.1, दिनांक २७ नोव्हेंबर, २०२३.
४) केंद्रीय रेशीम मंडळाचे पत्र क्र.CSB-37/1/ CSs(SS-2) Maharashtra/2021-26/ Vol.1, दिनांक १३ मे, २०२४.
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सपववि-४००१४ /३ /२०२४, DESKSERICULTURE CMTD, दिनांक १६ ऑगस्ट, २०२४.
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४
७) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५.
८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२५.
९) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.केपूयो-११२३/प्र.क्र. ६० /रेशीम कक्ष, दिनांक ३१ मार्च, २०२४.
१०) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र.रेशीम/कार्यासन-९/सिल्क समग्र-२/ BDS/सन २५/२४५ दिनांक ०७ मार्च, २०२५.
११) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.सपववि ४००१४/३/२०२४, DESKSERICULTURE CMTD, दिनांक २८ मार्च, २०२५.

**प्रस्तावना : -**

केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) योजना सन २०२१-२२ ते २०२५-२६ या कालावधीत राज्यात राबविण्यास संदर्भाधिन दि.९ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सन २०२२-२३ व सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात केंद्रीय रेशीम मंडळाकडून प्राप्त झालेला तसेच २०२२-२३ मधील अखर्चित राहीलेला केंद्र हिस्साचा निधी ( सन २०२२-२३ ₹ ३६.५६ लक्ष व सन २०२३-२४ ₹ २२६७.४६ लक्ष ) इतका निधी केंद्रीय रेशीम मंडळ बंगळूरु यांनी संदर्भाधीन दि.१३.०५.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सन २०२४-२५ या आर्थिक

वर्षात खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्याकरिता केंद्र हिस्सा ₹३१३.९१७४ लक्ष व त्यास पूरक राज्य हिस्सा ₹१५५.२०९७ लक्ष असा एकूण ₹४६९.१२७१ लक्ष इतका निधी वितरीत व खर्च करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने केंद्र पुरस्कृत सिल्क समग्र-२ अंतर्गत लाभार्थ्याकरिता केंद्र हिस्सा व त्यास पुरक राज्य हिस्साची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) अंतर्गत सन २०२२-२३ व सन २०२३-२४ मधील अखर्चित केंद्र हिस्सा निधीतून सर्वसाधारण प्रवर्गातील ४१८ लाभार्थ्यांकरिता केंद्र हिस्सा ₹३१३.९१७४ लक्ष व त्यास पूरक राज्य हिस्सा ₹१५५.२०९७ लक्ष असा एकूण ₹४६९.१२७१ लक्ष इतका निधी पुढील तक्त्यात नमूद केलेल्या बाबींसाठी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे :- **(रक्कम रु.लाखात)**

| योजनेचे नाव (१) | युनिट कॉस्ट (२) | लाभार्थी संख्या (३) | हिस्साचे प्रमाण (केंद्र : राज्य: लाभार्थी) | केंद्र हिस्सा (४) | राज्य हिस्सा (५) | एकूण निधी (४+५) (६) |
|---|---|---|---|---|---|---|
| तुती रेशीम कीटक संगोपन पॅकेज (१५० अंडीपुंज क्षमता) लागवड (१ एकर) | ०.६० | ६८ | ५०:२५:२५ | २०.४०० | १०.२०० | ३०.६०० |
| तुती रेशीम कीटक संगोपन पॅकेज (१५० अंडीपुंज क्षमता) लागवड (१ एकर) कीटक संगोपनगृह बांधकामासाठी सहाय्यता योजना (६०० स्के.फुट) | ३.२५ | १४७ | ५०:२५:२५ | २३८.८७५ | ११९.४३८ | ३५८.३१३ |
| ठिबंक सिचन ( २ एकर) | १.०० | २३ | ५०:२५:२५ | ११.२७२३ | ५.६३६१ | १६.९०८४ |
| ठिबंक सिचन ( १ एकर) | ०.६० | २७ | ५०:२५:२५ | ८.०५९ | ४.०३० | १२.०८९ |
| कीटक संगोपन सहित्य ( २एकर) | ०.७५ | ०१ | ५०:२५:२५ | ०.३६४ | ०.१८२ | ०.५४६ |
| कीटक संगोपन सहित्य ( १ एकर) | ०.५० | ८९ | ५०:२५:२५ | २२.१४७१ | ११.०७३६ | ३३.२२०७ |
| निर्जतुकीकरण साहित्य पुरवठा (२ एकर) | ०.०५ | ९ | ५०:२५:२५ | ०.२२५० | ०.११२५ | ०.३३७५ |
| निर्जतुकीकरण साहित्य पुरवठा (१ एकर) | ०.०५ | ३ | ५०:२५:२५ | ०.०७५ | ०.०३७५ | ०.११२५ |
| लाभार्थी बळकटीकरण | ०.०७ | ५० | १००:०:० | ३.५०० | ०.००० | ३.५०० |
| पाणी पुर्नवापर संयत्र उभारणी (रिलींग) | १८.०० | ०१ | ५०:२५:२५ | ९.००० | ४.५०० | १३.५०० |
| **एकुण रक्कम** | | | | **३१३.९१७४** | **१५५.२०९७** | **४६९.१२७१** |

२. सदर निधी केंद्र पुरस्कृत (Central Sector Scheme) "सिल्क समग्र-२" (ISDSI) सुधारीत मानकांना दिलेल्या प्रशासकीय मंजूरीनुसार व त्या संदर्भातील मार्गदर्शक सुचनांनुसार संचालक (रेशीम) यांनी खर्च करावा. तसेच, ज्या योजनांसाठी व बाबींसाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध केला आहे, त्याच बाबींवर सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या निधीतून झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्रीय रेशीम मंडळ व शासनास विहीत मुदतीत सादर करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

३.	सदर योजनेंतर्गत अनुदान देताना महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नानाजी देशमुख कृषि संजिवणी योजना (पोक्रा) व इतर शासकीय योजनेंतर्गत लाभ दिला नसल्याची खात्री करुनच पात्र लाभार्थ्यांना अनुदान अदा करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

४. सदर योजनेचा लाभ डीबीटी प्रणालीच्या मार्गदर्शक सुचनाप्रमाणे लाभार्थ्यांना अदा करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर योजनेंतर्गत लाभार्थ्यांनी लाभ घेतलेल्या बाबीअंतर्गत उभारण्यात आलेल्या मालमत्तेचे जीओ-टॅगींग करणे बंधनकारक राहील.

६. सदर योजनेच्या लाभ दिल्यांनतर/अंमलबजावणीनंतर प्रकल्प/लाभार्थी केंद्रित घटकांचे व्हिडिओ दस्तऐवजीकरण करणे बंधनकारक असून याबाबतची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

७.	सदर योजनेंखाली केंद्र हिश्श्यासाठी ₹३१३.९१७४ लक्ष ( अक्षरी रुपये तीन कोटी तेरा लक्ष एक्क्याण्णव हजार सातशे चाळीस फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यात येत असून उक्त खर्च “मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०२)(४९) रेशीम उद्योगाचा विकास (केंद्र पुरस्कृत) (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२८५१ १२६९), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” अंतर्गत सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

तसेच, राज्य हिश्श्यासाठी ₹ १५५.२०९७ लक्ष ( अक्षरी रुपये एक कोटी पंच्चावण लक्ष वीस हजार नऊशे सत्तर फक्त ) इतकी रक्कम वितरीत करण्यात येत असून उक्त खर्च हा “मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०२)(४५) रेशीम उत्पादक, खादी ग्रामोद्योग व ग्रामोद्योग विकास (कार्यक्रम) (२८५१ १२०४), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” अंतर्गत सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८.	उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी संचालक , रेशीम , रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी ( V०००३) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांचे अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे.

९.	सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने तसेच, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.२६८/२०२५ व्यय-२, दि. २८ मार्च, २०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२५०३३१२००६२४१९०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ALKA VISHRAMRAO JAGTAP

Digitally signed by ALKA VISHRAMRAO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=448f510bcadc7abd929408343ee74834ba4d3c8add456b66852582b6097ed093, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=32CC1545A1B50545BD5194D8C8A8B31532D9A97E1216092600CDFE0B5E29CEA1, cn=ALKA VISHRAMRAO JAGTAP
Date: 2025.03.31 20:07:28 +05'30'

**( अलका जगताप )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
४) अ.मु.स (नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अ.मु.स (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सदस्य-सचिव, केंद्रीय रेशीम मंडळ, बंगळूरु.
८) उप सचिव (अर्थसंकल्प) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
९) संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर.
१०) कोषागार अधिकारी, नागपूर.
११) संबधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१२) नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
१३) वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१३/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व प्रादेशिक रेशीम कार्यालये.
१५) सर्व जिल्हा रेशीम कार्यालये.
१६) अवर सचिव (का-१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती (रेशीम कक्ष).